**सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेसंदर्भातील मुद्यांचे स्पष्टीकरण.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः वेतन - ११११ /प्र.क्र. ८/सेवा- ३**
खो.क्र.३३५ (विस्तार), तिसरा मजला, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ०९ डिसेंबर, २०१६.

**वाचा**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक - वेतन ११०९/प्र.क्र.४४/सेवा-३, दिनांक १ एप्रिल, २०१०.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक - वेतन ११०९/प्र.क्र.४१/सेवा-३, दिनांक ५ जुलै, २०१०.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक - वेतन ११११/प्र.क्र.८/सेवा-३, दिनांक १ जुलै, २०११.

**शुध्दीपत्रक**

संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक १ जुलै २०११ च्या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट-"अ"** मधील मुद्दा क्र १.समोरील खालील स्पष्टीकरण रद्द करण्यात येत आहे.

| अक्र | मुद्दा | स्पष्टीकरण |
|---|---|---|
| १ | सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत दि.०१.१०.२००६ ते दि.३१.०३.२०१० या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांना या योजनेअंतर्गत दुसरा लाभ अनुज्ञेय आहे किंवा कसे? | सेवेत कार्यरत असताना पदोन्नती न मिळाल्यामुळे निर्माण झालेली कुंठितता घालविण्याचा या योजनेचा उद्देश आहे. त्यामुळे जरी पूर्वलक्षी प्रभावाने योजना लागू केली असली तरी आदेशाच्या दिनांकाला जे सेवेत कार्यरत आहेत त्यांनाच या योजनेचे लाभ अनुज्ञेय करण्याचा निर्णय घेतलेला आहे. म्हणून दिनांक ०१.१०.२००६ ते दिनांक ३१.०३.२०१० या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांना या योजनेअंतर्गत दुसरा लाभ अनुज्ञेय नाही. |

वरीलप्रमाणे मुद्दा १ समोरील रद्द केल्याच्या अनुषंगाने जे कर्मचारी/ अधिकारी हे दिनांक १.१०.२००६ ते दिनांक ३१.३.२०१० या दरम्यान शासन सेवेतून सेवानिवृत्त झाले आहेत अथवा ज्यांचे शासन सेवेत कार्यरत असताना सदर कालावधी दरम्यान निधन झाले आहे त्यांच्याकडून सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ मंजूरीबाबतच्या अटींची पूर्तता झाल्यानंतर त्यांना वेतननिश्चितीचा प्रत्यक्ष लाभ हा फक्त निवृत्तीवेतन विषयक / कुटूंब निवृत्तीवेतन विषयक लाभांकरिताच म्हणजेच निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्ती वेतन, सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान तसेच रजा रोखीकरण, या लाभ मंजुरीच्या प्रयोजनार्थ अनुज्ञेय राहील. संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांना दुसरा लाभ मंजूरीच्या अनुषंगाने थकबाकीची रक्कम अनुज्ञेय राहणार नाही.

हे शुध्दीपत्रक मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे याचिका क्र.७०६२/२०१४ व इतर संलग्न याचिकांमध्ये दि.२४/०६/२०१६ रोजी झालेले अंतीम आदेश व या अंतीम आदेशास अनुसरुन विधी व

न्याय विभाग मंत्रालय मुंबई यांनी त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.७५६-२०१६/ई दि.०८/०९/२०१६ अन्वये या विभागास दिलेल्या अभिमतास तसेच शासन मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०९१६५६२१३९०५ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Devidasrao Londhe

Digitally signed by Shrikant Devidasrao Londhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9d297f5b1e7f2bf7e6f49cd44c8fa4445bb6dd845973cab6e8165c47a8f46a4, serialNumber=b973cbc71c4136d97edeae58395e03da221147d1afdd343ba4d7a2492e6a54b6, cn=Shrikant Devidasrao Londhe
Date: 2016.12.09 16:58:07 +05'30'

**( श्री.दे. लोंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. सर्व मंत्रालयीन विभाग,
६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय
७. सचिव, मा.सभापती, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
८. सचिव, मा.अध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई
९. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
१०. *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
११. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१३. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१४. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
१५. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
१६. आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
१७. सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
१८. सर्व विभागीय आयुक्त,
१९. सर्व जिल्हाधिकारी,
२०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२१. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
२२. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,

२४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
२५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
२६. सिनियर रिसर्च ऑफिसर, पे-रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
२७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२९. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
३०. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.
३१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३३. लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई / नागपूर / पुणे/ औरंगाबाद
३४. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
३५. *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
३६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
३७. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १
३८. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २०
३९. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४,राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई ४
४०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३
४१. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५
४२. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१
४३. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८
४४. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
४५. निवड नस्ती, कार्यासन सेवा-३.

*पत्राद्वारे.